**गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र. ३२ /११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख - २७ सप्टेंबर, २०२१

संदर्भ :-

**१) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, क्र. शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.३१.८.२०१९.**
**२) शासन परिपत्रक कृषि व पदुम विभाग, क्र.शेअवि-२०१८/प्र.क्र.१९३/११-अे, दि.१९.९.२०१९.**
**३) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसंदर्भातील राज्यस्तरीय समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.**
**४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र. ३२ /११-अे, दि.८.०३.२०२१.**
**५) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, गोमुशेअवि-२०२१/प्र.क्र. ३२ /११-अे, दि.२४.३.२०२१.**
**६) आयुक्तालयाचे पत्र क्र. गोमुशेअवि-२०२०/ प्र.क्र. १७ (ब) /सा.९/१६३६३/२०२१, दि.२१.५.२०२१.**
**७) आयुक्तालयाचे पत्र क्र. शेअवि-२०२१/ प्र.क्र. १७(ब) /सा.९/२५९६१/२०२१, दि.९.०८.२०२१.**

**प्रस्तावना :-**

राज्यात शेती व्यवसाय करतांना वीज पडणे, पूर, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्ती सर्पदंश, विंचूदंशमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात तसेच अन्य कोणत्याही कारणामुळे होणारे अपघात, यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढावतो किंवा काहीना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस तसेच त्याच्या कुटुंबातील सदस्यास झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होऊन अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस व त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता राज्यातील सर्व वहितीधारक खातेदार शेतकरी व शेतकऱ्याच्या कुटुंबातील वहितीधारक खातेदार म्हणून नोंद नसलेला कोणताही १ सदस्य (आई-वडील, शेतकऱ्याची पती/पत्नी, मुलगा व अविवाहीत मुलगी यापैकी कोणतीही एक व्यक्ती) असे १० ते ७५ वयोगटातील एकुण २ जणांना गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना राबविण्यास संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सुधारीत स्वरुपातील गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना राबविण्यासाठी संदर्भ क्र. (२) येथील शासन परिपत्रकान्वये कार्यपद्धती व मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना राज्यामध्ये राबविण्यासाठी युनिव्हर्सल सोम्पो जनरल इन्शुरन्स कंपनी या विमा कंपनीची व ऑक्झॉलियम इन्शुरंन्स ब्रोकिंग, प्रा. लि या विमा सल्लागार कंपनीची स्पर्धात्मक ई-निविदेच्या माध्यमातून संदर्भ क्र. (३) नुसार निवड करण्यात आलेली आहे. त्यानूसार संदर्भ क्र (४) नुसार विमा कंपनी व विमा सल्लागार कंपनी यांना विमा हप्ता अदा केल्यानंतर एक वर्षाच्या कालावधीत योजना राबविण्यासाठी शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ (५) अन्वये विमा कंपनी व विमा सल्लागार कंपनीस देय ठरणारा पहिल्या सहा महिन्यासाठी देय विमा हप्ता अनुदान वितरीत करण्यात आलेले आहे. आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (७) अन्वये प्रस्तावित केल्यानुसार विमा कंपनी व विमा सल्लागार कंपनीस देय ठरणारा दुसऱ्या सहा महिन्यासाठी देय विमा हप्ता अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेचा विमा हप्ता अदा केल्यानंतर एक वर्षाच्या कालावधीसाठी दि युनिव्हर्सल सोम्पो जनरल इन्शुरंन्स कंपनी लि. या विमा कंपनीमार्फत व ऑक्झॉलियम इन्शुरंन्स ब्रोकिंग, प्रा. लि. या विमा सल्लागार कंपनीमार्फत राबविण्यास शासन निर्णय दि.८.३.२०२१ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सन २०२१-२२ मध्ये विमा हप्ता रकमेचे विमा कंपनीला प्रदान झाल्यापासून १२ महिने इतक्या कालावधीकरीता राज्यातील सर्व वहितीधारक खातेदार शेतकरी व त्यांच्या कुटुंबातील वहितीधारक खातेदार म्हणून नोंद नसलेला एक सदस्य यांना विविध अपघातांपासून संरक्षण देण्यासाठी विमा कंपनीला व विमा सल्लागार कंपनीस आणि कार्यालयीन खर्चासाठी मंजूर करण्यात आलेली रक्कम व पहिल्या सहा महिन्यासाठी अदा केलेली विमा हप्ता रक्कम व विमा ब्रोकरेज रक्कम तसेच तसेच दुसऱ्या सहा महिन्यासाठी अदा करावयाची विमा हप्ता रक्कम खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | विमा कंपनी/ कृषि आयुक्त कार्यालय | शेतकरी / कुटुंबातील सदस्य | मंजूर करण्यात आलेली रक्कम (रु.) | पहिल्या हप्त्यासाठी वितरीत केलेली रक्कम (रु) | दुसऱ्या हप्त्यासाठी वितरीत करावयाची रक्कम (रु) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **१** | दि युनिव्हर्सल सोम्पो जनरल इन्शुरंन्स कंपनी लि. | ३.०४ कोटी | ८८,३७,२८,०००/- | ४४,१८,६४,०००/- | ४४,१८,६४,०००/- |
| **२** | ऑक्झॉलियम इन्शुरंन्स ब्रोकिंग, प्रा. लि. | ३.०४ कोटी | ५,९६,६६२/- | २,९८,३३१/- | ०० |
| **३** | कृषि आयुक्त कार्यालय (कार्यालयीन खर्च) | | ८०,०००/- | ८०,०००/- | ०० |
| | **एकूण** | | **८८,४४,०४,६६२/-** | **४४,२२,४२,३३१/-** | **४४,१८,६४,०००/-** |

३. वरील तक्त्यातील रकाना क्र.६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे उर्वरित ६ महिने कालावधीकरीता निश्चित होणारी विमा हप्ता एकूण रक्कम रु. ४४,१८,६४,०००/- (रुपये चव्वेचाळीस कोटी अठरा लाख चौसष्ट हजार फक्त) विमा कंपनीस उपलब्ध करून देण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. "गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना" शासन निर्णय दि.३१ ऑगस्ट, २०१९ व शासन परिपत्रक दि. १९ सप्टेंबर,२०१९ मध्ये नूमद तरतूदी व अटींनुसार राबविण्याची जबाबदारी आयुक्त (कृषी) यांची राहील.

५. यावरील खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करीता मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी-३,**
**२४०१-पीक संवर्धन,**
**११०-पीक विमा,**
**(००) (०६) गोपिनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम) (२४०१ ४४२७),**
**३३ - अर्थसहाय्य"**

६. प्रस्तुत प्रयोजनासाठी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी, तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे २८२/१४३१, दि. २५.०८.२०२१ व २७०/२०२१/व्यय-१, दि. १६.०९.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२१०९२७१५१२२५३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sarita Rishi Bandekar Deshmukh
Date: 2021.09.27 15:15:52 +05'30'

**( सरिता बांदेकर- देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी

४. सर्व मा.विधानसभा सदस्य

५. सर्व मा. विधानपरिषद सदस्य

६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२

७. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुमविभाग, मंत्रालय, मुंबई ३२

८. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई ३२

९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०.अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

१२.प्रधान सचिव (अपिल व सुरक्षा), गृहविभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१३.अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती ) प्रसिध्दीच्या विनंतीसह

१५.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)

१६.आयुक्त (कृषि), कृषिआयुक्तालय, महाराष्ट्रराज्य, पुणे

१७.सर्व जिल्हाधिकारी

१८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्रराज्य, पुणे

१९.सर्व विभागीय कृषि सहसंचालक

२०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

२१.सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी

२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), मुंबई.

२३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखावअनुज्ञेयता ), मुंबई

२४.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), नागपूर

२५.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखावअनुज्ञेयता),नागपूर

२६.संचालक, लेखावकोषागारे, मुंबई

२७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

२८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

२९.ग्रंथालय प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)

३०.मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्रराज्य, पुणे-

३१.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्रराज्य, पुणे

३२.सर्व तहसिलदार

३३.सर्व उप विभागीय कृषि अधिकारी

३४.सर्व तालुका कृषि अधिकारी

३५.सर्व उपसचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३६.सर्व मंत्रालयीन विभाग

३७.पक्ष यांची मध्यवर्ती कार्यालये

३८. दि युनिव्हर्सल सोम्पो जनरल इन्शुरंन्स कंपनी लि., २०२, दुसरा माळा, विनर कोर्ट, झेड के च्या वरती, लुला नगर, सहाने सुजन पार्क, पुणे-४११०४०.

३९.ऑक्झॉलियम इन्शुरंन्स ब्रोकिंग, प्रा. लि. नवी मुंबई -४००७१०.

४०.निवडनस्ती, कार्यासन ११-अे